जाऊन आपल्या रांगाफोडीनांत; असें पाहून हेनरी राजा हास्यमुख करून बोलिला, " हे माझे मित्र हो, ते प्रारंभ करीत नाहींत तर आपण त्यांस करून दाखवूं; ह्मातर आतां पुढें, देवत्रिलु तुमचें संरक्षण करील " हें ऐकून शब्द करीत होत्साते, ते इंग्लिश पुढें झाले; तंवपर्यंत फ्रेंच त्यांस न भिऊन वाट पहात बसले होते. जा इंग्लिश तीरंदाजांची मोठी कीर्ति होती, त्याणें तीन फुट लांब अशी बाणाची एकदम वृष्टि केली; तीपासून शत्रूंच्या बहुत नाश झाला. ते तीरंदाज तों पर्यंत कोठे लपून होते, आणि अकस्मात् येऊन बाण मारूं लागले; त्यांवर फ्रेंचाचे घोडेस्वार चढून गेले; त्यांची अशी धांदल झाली कीं, इंग्लिशांनी तें पाहून धनुष्य बाण टाकून दिले; आणि ते तरवारी घेऊन त्यामध्यें शिरले. ते इंग्लिश दुखण्यामुळें अशक्त झाले होते, ह्मणून प्रथम त्यांस फ्रेंचानीं मागें पळविलें; परंतु त्यांचा पराक्रम असा

सा कीं, ते अकस्मात् शत्रूंवर जाऊन कोसळले; तेणेंकरून फ्रेंचांचा पराजयच झाला.

फ्रेंच त्या लढाईंत सर्वत्र पराभव पावले; त्यांची फौज अरुंद जाग्यांत होती, म्हणून तीस पळतां येईना; आणि लढाईही साधेना. यामुळें त्याणीं इतकें मात्र केलें कीं, प्रेतांचे ढिगानीं भूमि व्यापिली. शत्रूंपासून निवारणाचें भय अगदीं गेल्यावर, सैन्याचे पाठीमागून एक दंगा झाला. तो असा. कितिएक भिकाऱ्यानीं येऊन इंग्लिशांचे बुणग्यावर हल्ला केला; आणि ते राखीत होते, त्यांस मारूं लागले. मग हेनरी राजा चहूंकडून शत्रूंचा उपद्रव पाहून मनांत भिऊं लागला कीं, आपले फौजेपेक्षां बंदिवान् अधिक आहेत, हे आपल्यास एकादें अरिष्ट करितील. म्हणून त्याणे हुकुम केला कीं, त्या सर्वांस मारावें; परंतु आपल्यास निश्चयें विजय प्राप्त झाला हें त्यास समजतांच, त्याणें तो बंद केला; आणि बहुतांचे प्राण रक्षिले. हा विजय मिळाला त्यापासून

पासून त्याची मोठी कीर्ति झाली असती; पण अशा दौरात्म्यानें ती फुकट गेली. त्या काळीं असेंच होतें कीं, शौर्य आणि क्रूरपणा याणीं एकत्र वास करावा. त्या लढाईंत फ्रेंचांचे सुमारें दहा हजार पडले, आणि चवदा हजार धरिले गेले; आणि इंग्लिशांचे सर्व मिळून चाळीस मेले.

स० १७ त्या काळीं फ्रान्स देशाची मोठी हलाखी होती; सर्व राज्य असें दिसूं लागलें कीं, जसे अपराध, खून, अन्याय आणि नाश यांची शाळाच. बर्गंडीचे ड्युकानें, आर्लियनूसाचे ड्युकास मारिलें; त्याला फ्रानूस देशचे वडील राजपुत्रानें मारिला. चॉर्लिस भितरा होता म्हणून तो कोणते कामाची चौकशी करीत नसे. राजा हेनरीनें विजय* आणि तह करून शेवटीं फ्रेंच राज्याचा अधिकार मेळविला. त्या तहनाम्यांत मुख्य कलमें हीं होतीं, कीं फ्रानूस देशाचे राजाची मुलगी क्याथेरैन तिशीं हेन-

* फ्रान्स् देशीं जो त्याकाळीं राज्य करीत होता.

रीनें

रीनें लग्न करावें; चार्लिस राजानें जन्मवर आपलें पद आणि अधिकार यांचा उपभोग करावा; हेनरीला राज्याधिकारी ह्मणावें; आणि त्याणें राज्य कारभार करावा. पुढें फ्रान्स आणि इंग्लंड या दोन देशाचें राज्य एका राजानें करावें; परंतु दोनही देशांत तेथील राज्यनीति आणि अधिकार पूर्ववत् राखावे.

हा अधिकार मिळाल्यावर हेनरी राजा पारिस शहरांत राहूं लागला. त्या दोन राजांमध्यें चार्लिसाचे दरबारांत लोक फार नसत; परंतु हेनरी जवळ मोठी सभा असे. एके दिवशीं ते दोन राजे आणि त्यांच्या बायका मस्तकावर मुकुट घातलेल्या एकत्र जेवायास होत्या; तेव्हां लोक चार्लिसास बाहेरून मात्र मान देत असत; परंतु राजा हेनरी सत्तेनें आज्ञा करीत असे. अशी त्याची कीर्ति शिखरास आली आहे, आणि दोनही राज्यें त्यास प्राप्त झालीं आहेत; अशांत, त्यास एक रोग झाला; तेणें करून

ते

तो आपले वयाचे चवतिसावे वर्षीं मरण पावला. त्याणें दहा वर्षें राज्य केलें.

---

## प्रकरण १८

### षष्ठ हेनरी राजाची कथा.

सन १४२२ पासून १४६१ पर्यंत.



राजाचा भाऊ बेड्फोर्डाचा ड्युक त्या काळचे पुरुषांत मोठा गुणी होता. त्यास पाण्यांतून आणि जमिनीवरून युद्ध करायाचा सारिखा अभ्यास असे; म्हणून हेनरी राजाचा पुत्र (जो एक वर्षाचाही नव्हता तो) मोठा होई पर्यंत त्या ड्युकानें काम चालवावें असें पार्लमेंटानें ठरविलें. त्याणें इंग्लंडाचें पाल-

न करावें, धर्माची संस्थापना करावी, आणि राजपुत्रास मसलत सांगावी असें केलें. तेव्हां फ्रान्स देशाकडे सर्व इंग्लिशांचें लक्ष्य लागलें आहे, असें पाहून ड्युकानें सर्व लोकांचें सामर्थ्य त्यां देशांत खरचिलें.

पुढें फ्रान्स देशांत दुसरी एक अदलाबदल झाली. तिलाजीं कारणें झालीं त्यांचा विचार केला असतां तीं, असें काम सिद्धीस आयाविषयीं फार निर्बळ दिसतात. तीं अशीं.

लारेइन प्रांताचे कांठास वोकुलोर शहराजवळ डाम्रेनि गावांत एक खेडे गांवाची बायको राहत असे. ती सत्तावीस वर्षांची होती. तिचें नाव जोन आफ् आर्क. ती बायको एके धाकटे पांथशाळेंत* चाकरीस असे. त्या गरीब दशेंत काम करून तिचें शरीर कठी-

* पांथशाळा म्हणजे, वाटसरू लोकांस पैका घेऊन खाया पियास घालायाच्या सरंजाम जांत असतो, तें घर.

ण झालें होतें; तें असें कीं, लढाई करायाचे उपयोगी. तिचें आचरण निर्दोष होतें; आणि पुढें थोडे दिवशीं तिचे मध्यें जे गुण दृष्टीस पडले, त्यांचें अगोदर कांहींच लक्षण दिसत नसे. आपला देश विपत्तींत पडला, ही गोष्ट तिचा मनांत येऊन तिला फार वाईट वाटे; आणि तिचा चित्तांत कितिएक संकल्प उत्पन्न होत. ते ईश्वरानेंच सूचविले असें तिला वाटे. पुढें आपली मसलत वास्तवीक आहे, अशी तिची खातरी झाली; आणि ती वोकुलोर शहरचा अमलदार बाद्रीकोर्ट ह्मणून होता त्या जवळ जाऊन बोलिली कीं, आपला देश या दुष्ट लबाडांपासून मुक्त करायास मला देवानें निर्माण केली आहे. तें ऐकून प्रथम बाद्रिकोर्टानें तिची फारशी वाचपुस केली नाहीं; परंतु शेवटीं तिचा अतिशय आग्रह पाहून त्याणें बरोबर कांहीं लोक देऊन तिला चिनन शहरास पोंचती केली. त्या शहरांत तेव्हां फ्रेंचांचें दरबार

असे

असे.

ती बोलत असें तें सर्व व्यर्थ असें तेथील दरबारी लोकांचे बहुधा ध्यानांत आलें असेल; परंतु आपलें क्षयास जाणारें जें राज्य त्याचें रक्षण जा उपायानें होईल, तो करायाचा बाकी ठेवूं नये, असें त्यांचे मनांत होतें. म्हणून असें प्रसिद्ध केलें कीं, **जोनेचा** शरीरांत ईश्वरी संचार झाला; ती, राजा जरी सर्व अलंकार भूषणें टाकून आपले अमात्य मंडळींत बसला, तरी त्यास ओळखते; राजास मात्र जा कितिएक खुणेचा गुह्यगोष्टी ठाऊक आहेत, त्या ती सांगते; आणि **सेंटक्याथेरिन डीफयर्बीआचे** देवळांत एक तरवार आहे, ती तिणें कधीं पाहिली नसतां, ती अशी अमके रीतीची आहे हें यथास्थित सांगून ती आपले जवळ घेऊन या असें बोलिली. या रीतीनें साधारण अज्ञान लोकांचे मनांत तिचा दर्शनाविषयीं औत्सुक्य उत्पन्न झाल्यावर, तिचा

आंगांत

आंगांत डोकीपासून पायांपर्यंत कवच घातलें. आणि लढाईच्या वेष देऊन लोकांचे दृष्टीस पाडिली. पुढें तिला सर्व विद्यालयांतील विद्वानापाशीं नेली; ते तत्समयानुसार भोळेपणाचे योगानें, अथवा तें ढोंग सिद्धीस जावें अशा मसलतीनें ह्मणाले कीं, वास्तवीक, इच्या मनांत ईश्वरी संचार झाला आहे खरा.

या रीतीनें तिचे उद्योगाची सर्व तयारी लोकांस उघडपणें जाहीर झाल्यानंतर, तिला शत्रूंवर पाठवायाची त्याणीं मसलत केली. त्यावेळेस **चार्लिस** राजा चोरून **आर्लियनूस** शहरांत जाऊन राहिला होता; **इंग्लिशांनीं** त्या शहरास वेढा घातला होता; आणि तें अनायासें त्यांचे स्वाधीन होईल असें दिसत होतें. **जोनेनें** तो वेढा उठवायाचें काम पतकारिलें; आणि आपली कीर्ति विशेष व्हाया करितां, पूर्वी जा तरवारीची इतकी प्रख्याति झाली होती, ती कमरेस बांधिली.

या

रीतीनें सिद्ध झाल्यावर, तिणें फौजेस पुढें जाया-चे पूर्वीं शपथा घ्यायाचा हुकुम केला; आपले हातांत एक ईश्वरी चिन्ह धारण केलें; आणि सैन्यास आश्वासन दिलें कीं, फत्ते झालीच ह्मणून समजा. तिणें असा निश्चय दाखविला तेणें करून **फ्रेंचांचे** फौजेस हुशारी आली. पुढें, जे **इंग्लिश** पूर्वीं तिचे उद्योगाची थट्टा करीत होते, तेही तिला मनांतून भ्याले; आणि आपला प्रयत्न हळूहळू कमी करीत करीत, शेवटीं अकस्मात् वेढा उठविते झाले. पुढें **फ्रेंचांच्या** उत्तरोत्तर जय होत चालिला. शेवटीं त्यांचा राजास **रीम्स्** शहरांत राज्याभिषेक केला. असें घडून येईल ह्मणून पूर्वीं **जोनेनें** सांगीतलें होतें.

हा उत्साह झाल्यावर उत्तरोत्तर **फ्रेंचांची** फत्ते होत चालिली. परंतु पुढें **जोन** एक फौजेची टोळी घेऊन **कोंपेन** शहर; जें बर्गंडीचे **ड्युकानें** वेढा घातला होता, त्यांत

शिरली

शिरली; आणि तेथून ती शत्रूंशीं युद्ध करीत होती. इतक्यांत त्या शहरचे अमलदारानें दरवाजे लाविले, ह्मणून ती कैदेंत पडली. **बेड्फोर्डाचे ड्यूकास** तें वर्तमान समजतांच, **जार्कौं-टवांडामानें** तिला धरिली होती, त्यापासून विकत घेऊन बंदींत घातली. **इंग्लंड** आणि **फ्रान्स** या दोनही देशांतील लोकांमध्यें भोळेपणा त्या वेळेस इतका होता कीं एकादी गोष्ट त्यांचे मनोगतास मिळाली ह्मणजे, ती खरी वाटायास चिंता नाहीं. थोडे दिवसां पूर्वीं फत्ते झाल्यामुळें **जोनेला** सिद्ध अशी मानीत असत; परंतु पुढें बंदींत पडल्यावर तिला गौड बंगाली ह्मणूं लागले; आणि बोलत कीं, कोणी भूत तिला कांहीं दिवस पर्यंत सहाय झालें होतें तें सोडून गेलें. ह्मणून तिची **रुआन** शहरांत चौकशी केली, तेव्हां तीवर गौडबंगाल आणि जुव्वाई यांचा आरोप ठेऊन जीवंत पुरावी असा हुकुम दिला; आणि तो निर्दयपणानें सि-

ह्रीस नेला.

पुढें **इंग्लिशांस** जीं संकटें येऊं लागलीं, त्यांस कांहीं उपाय चालेना. **पारिस** शहर पूर्वी प्रमाणें **फ्रेंच** राजाचे हातीं आलें; आणि या रीतीनें हळूहळू **फ्रेंचानीं** पाय शिरकविला. पुढें थोडीं वर्षे गेल्यावर, **फ्रान्स** देशांत जीं **इंग्लिशानीं** ठाणीं केलीं होतीं, त्यांतून एक **क्यालेइस** मात्र त्यां कडे राहिलें. त्या देशांत इतकीं माणसें, आणि पैका खरचला, त्याचें हें फळ कांहींच झालें नाहीं. पुढें **हेनरीची** अशक्तता स्पष्ट दिसून आली; आणि बाहेर कोठें लढाई नाहीं अशी झाली ह्मणून लोक आंतलेआंत तंटा लागाया विषयीं उद्योग करूं लागले. पूर्वी संपत्तिकाळांत जो पक्ष लपला होता, तो त्यावेळेस उघड झाला. तें वर्तमान असें. तृतीय **एड्वर्डाचा लयोनल** ह्मणून जो वडील पुत्र, त्याचे कन्या वंशा[illegible] **रिचर्ड** नामें एक पुरुष **यार्कांचा ड्यूक**

होता

होता. त्या वेळेस राज्य करणारा जो **हेनरी** तो त्या **एड्वर्डाचा** धाकटा मुलगा, **जानआफगांट** होता त्याचे वंशांतला. ह्मणून **हेनरीचे** पूर्वी आपण राज्य करणार असा **रिचर्डानें** अभिमान धरिला, आणि त्यास वाटलें कीं, आपला लोभ सिद्धीस जायास हा चांगला समय आहे. मग **रिचर्डाचा** पांढरा गुलाब, आणि **हेनरीचा** तांबडा, अशीं दोन चिन्हें त्या दोघांनीं धारण केलीं. यां वरून त्या दोन पक्षांसही तीं नावें पडलीं; जाहीं करून पुढें सर्व राज्यांत बहुत रक्त पडलें.

त्या राज्यांत लोक संतुष्ट नव्हते, ह्मणून जिकडे तिकडे हाहाकार पडला; तेणे करून बंडें उत्पन्न होऊं लागलीं; त्यांत एक फारच बळकट झालें; जा मध्यें मुख्य **जानकेड** होता. त्या **जानकेडाचा** जन्म मुळचा **अयर्लंडांतला**. तो कांहीं अन्याया करितां **फ्रान्स** देशांत पळून गेला होता; आणि परत आ-

ला

ला तेव्हां, लोकांचें लक्ष्य कांहीं तरी भयंकर कर्म करण्याकडे पाहून त्याणें आपलें नाव **मार्टि-मर** ठेविलें; पुढें तो वीस हजार **केंतिश** फौज घेऊन राजधानीकडे आला, आणि **ब्लाकूही-थ** ठिकाणीं तळ देऊन राहिला. राजास ही गोष्ट समजतांच, त्याणें निरोप सांगून पाठविला कीं, तुह्मीं युद्धास तयार झाले आहां, याचें कारण काय? तेव्हां **जानकेडानें** लोकांकडचें उत्तर दिलें कीं, आमचा मनांत दुष्ट अमात्यांचें शासन करून लोकांचीं दुःखें दूर करावीं असें आहे. पुढें त्याणें लबाडीनें गावांतले लोकांशीं कांहीं तरफदारी केली; या मुळें तो **राचेस्तरास** चोरून निघोन गेला; आणि तेथून एकदा **केंत** प्रांतांतील रानांत पळाला; पुढें त्याचें डोकें जो घेऊन येईल त्यास अमूक इनाम मिळेल असें जाहीर केल्यावर, तो धरून मारिला गेला.

त्या काळीं **यार्कोचा ड्युक** आंतून हा तंटा वृद्धिंगत व्हावा ह्मणून प्रयत्न करीत

रीत होता; आणि तो लोकांचे पक्षाचें आपणास अगत्य आहे असें दाखवून आंतून राज्य मिळायाची इच्छा करीत असे. या गोष्टीचें तर त्यास अतिशयच अगत्य होतें खरें; परंतु कांहीं वेळ पर्यंत, तें राज्य जबरदस्तीनें घेतलें असतां कसें होईल, असा आपलेच मनांत संशय आणून तो उगीच होता. जी गोष्ट त्याचे युक्तीनीं घडून येईना ती दैववशात् त्याचे इच्छेप्रमाणें घडून आली. ती अशी. राजास कांहीं दुखणें लागलें, तेणें करून त्याचा जो स्वाभाविक भित्रेपणा होता तो अधिक झाला; तो इतका कीं, बाह्यात्कारींही राजत्व धारण करायाचीही त्यास शक्ति राहिली नाहीं. म्हणून **यार्कीस** राज्याचा **लेफ्टेनंट*** आणि संरक्षक हीं पदें देऊन कामावर स्थापिला. त्याजवळ सत्ता इतकी दिली कीं, त्याणें मर्जीस येईल तेव्हां **पार्लमेंटा**-

* लेफ्टेनंट म्हणजे प्रतिनिधि हें लढाई स्वाऱ्यांत एक पद आहे.

ची सभा करावी.

या रीतीनें मोठी सत्ता हातांत आल्याव-र, तो **यार्क** कांहीं दिवस पर्यंत स्वस्थपणें ति-चा उपभोग घेत होता; इतक्यांत इतदैव **हेन-री** राजा सुस्तीचे दुखण्यांतून बरा झाला. ते-व्हां जसा एकादा स्वप्न पडून अकस्मात् जागा होतो, तसा तो आपली सर्व सत्ता गेली पाहून चकित झाला. राजा **हेनरीनें, मार्गारेट आफ आंजु** ह्मणून बायकोशीं लग्न केलें होतें. त्या बायकोची बुद्धि पुरुषा सारिखी शूर होती, ह्मणून तिणें राजास युद्ध करणें अवश्य प्राप्त केलें. मग उभयपक्षीं लढाई होऊन **यार्कोचा** संपूर्ण जय झाला. त्या लढाईंत वार लागल्यामुळें **हेनरी** एकाजव-ळचे झोंपड्यांत जाऊन दडून राहिला होता, तेथें तो धरिला गेला; परंतु कैदेंत असतांही **यार्कोनें** त्याचा ममतेनें चांगला समाचार घेतला.

हेनरीचे

हेनरीचे, कैदेंतही राजा सारिखे उपचार चालिले होते; आणि तो जातीनें आळशी, आणि अशक्त होता ह्मणून, त्या दशेंतच त्यास संतोष आहे असें दिसे. जा सत्तेचा उपभोग श्रमानें होतो, ती गेली ह्मणून त्यास खेद झाला नाहीं. परंतु जी पूर्वीं त्याची मार्गारेट ह्मणून राणी सांगीतली, तिणें त्यास पुनः एकवेळ आपल्या अधिकारीं स्थापणें प्राप्त केलें. तें असें. तिचें आणि यार्कांचें सैन्य स्ताफोर्ड प्रांतांत बोर्हीथ ठिकाणीं येऊन राहिलें. तेथें प्रथम यार्कांचा थोडासा जय झाला; परंतु सर आंड्रुत्रालप ह्मणून एक सरदार होता तो त्यापासून आपले सगळे लोक घेऊन राजपक्षास मिळाला. तें पाहून यार्कांचे लोक मनांत फार भय पावले, ह्मणून एकही वार न करितां दुसरे दिवशीं त्यांची फाटाफूट झाली; पुढें कितिएक लढाया झाल्या, त्यांत उभय पक्षांचाही जय झाला. तें असें

(३स सन ..)

कीं

कीं, एकवेळ मार्गारेटच्या जय होई, दुसऱ्यानें तिला देश सोडून जायाचें पडे. शेवटीं वेकफील्डग्रीन या नावाचे मैदानांत जी लढाई झाली, त्यांत यार्कांचा ड्युक पडला, आणि तिचा भाग्योदय स्थिर झाला असें दिसों लागलें.

पुढें यार्कांचे लोकांचा मुख्यपणा वार्विकाचा अर्ल करूं लागला. त्याची त्या वेळेस मोठी कीर्ति असे; तो संकटसमयीं मोठा कावेबाज, आणि शूर; तसाच दरबारांत आणि लढाईंत सारिखा दक्ष. अशा त्या पुरुषाचे मनांत राणीशीं असा कांहीं द्वेष उत्पन्न झाला कीं, तो कोणत्याही गोष्टीनें जाईना. तो आपले हाता खालीं पुष्कळ फौज घेऊन त्या बंदिवान राजास बरोबर घेऊन जात असे. त्याचे फौजेंत एक लंडन शहरचे लोकांची टोळी होती; ती त्याचे पक्षास अनुकूळ असे. अशी आपली फौज घेऊन तो अर्ल राणीचा पक्षाचे लोक येतात पाहून पुढें चालिला.

सेंट

सेंटआल्बानूस शहराजवळ त्याची आणि राणीची लढाई झाली; ती मध्यें त्याचाच पराजय झाला. त्याचे सुमारें दोन हजारांवर लोक पडले. राजा तेव्हां हातीं सांपडला, त्यावर त्याचे लोक बाहेरून मात्र ममता करीत; परंतु आंतोन त्यास फार कंटाळले होते.

पूर्वी मरण पावल्या यार्कीचे ड्युकाचा पुत्र एड्वर्ड, तो आपल्या पक्षाची जी हानि झाली तिला उपाय करून यार्क शहरांतील लोकांस धीर यावा म्हणून उद्योग करूं लागला. तो तारुण्यांत आला होता. सुंदर शरीर, शौर्य, आणि मन मिळाऊ स्वभाव, हे गुण त्या मध्यें चमत्कारिक होते. तो गृहस्थ. वार्विकाची बाकीची फौज घेऊन लंडनाकडे गेला; आणि मार्गारेट राणीला पळवून लोक जयजयकार करिताहेत, असा होत्साता शहरांत प्रवेश करिता झाला. लोकांची आपल्यावर खुशामर्जी पाहून एड्वर्डानें

मनांत

मनांत आणिलें कीं, राज्यावर आतां जर सत्ता केली तर वेळ बरा आहे. मग त्याचा स्नेही जो वार्विक त्याणें सेंट जान्स् फील्ड् मैदानांत सर्वांस बोलावून आणून उघड सांगीतलें कीं, राज्याचा अधिकार एड्वर्डास आहे.
स० ४६१ लंकास्तराचे संस्थानापासून जें दौरात्म्य झालें होतें, त्याची त्याणें बहुत व्याख्या केली. पुढें राज्य कोणी करावें हें ठरावया करितां पुनः एक वेळ उभयपक्षींचीं सैन्यें येऊन भिडलीं; त्या भयंकर युद्धांत जितका लोकांचा नाश झाला तितका कधींही झाला नव्हता. एकाच देशाचे एक लक्ष लोक परस्परांचा जीव घ्यायाविषयीं उद्योग करीत आहेत; ( आणि तो उद्योग कशा करितां कीं, सर्व मनुष्यांत अतिशय नीच आणि दुर्बळ असे जे पुरुष त्यांचा लोभ तृप्त करायासाठीं; ) असें पाहून मनांत भय वाटतें. एड्वर्डाची फौज युद्धासाठीं पुढें चालिली होती; इतक्यांत पुष्क-

ळ

ळ हिंव पडलें; तें शत्रूंचे तोंडा समोरच्च पड-
ल्यामुळें त्यांस दिसेनासें झालें हें एक आ-
णि तेव्हांच ते चढून पुढें गेले, या दोन कार-
णानीं एडुर्डाचा विजय झाला. त्याणें हुकूम
केला कीं, दया करूं नये; तेणें करून जी एका-
एकीं मारामार झाली तींत सुमारें चाळीस ह-
आर लांकास्तर मांतांतील लोक पडले.

दुर्बळ, हतभाग्य, मूर्ख, आणि सदैव अ-
यशस्वी असा जो हेनरी तो सांपडून बंदींत
पडला; मग, त्यास लंडनांत, मोठ्या फजी-
तीनें नेला; आणि किल्ल्यावर टाकिला. मा-
र्गारेट त्या पेक्षें किंचित् विशेष दैववान् अ-
सून ती कांहीं युक्ती करून पळून गेली; आ-
णि फ्लांडर्स देशांत तिचा बाप होता त्याचे
आश्रयास जाऊन राहिली.

या रीतीनें वार्विकाचे अर्लाचे मद-
तीनें राजा सिंहासनावर स्थिर झाल्यानंतर
पार्लमेंटास त्याचा पक्षपात होता; लोकही

त्याचा

त्याचा स्वाधीन होते; आणि तो सुखानें स्वस्थ राज्य करीत होता. असें सर्वत्र निर्भय झालें पाहून तो आपले मर्जीस येईल त्या प्रमाणें विषयोपभोग करूं लागला; आणि त्याचे दरबारांत व्यभिचार, आणि घातुकपणा यांचा प्रचार बहुत होऊं लागला. जा ठिकाणीं एके दिवशीं भयंकर असें दुष्ट कर्म घडावें, त्याच ठिकाणीं दुसरे दिवशीं नाच रंग तमासे हीं व्हावीं; आणि तेथें राजानें एके दिवशीं एकादे स्त्रीस, आणि दुसरे दिवशीं दुसरे कोणाचा शिरछेद करून तें पहावें; असें वर्तमान चालिलें असे. अशा गोष्टीनीं लोक त्याची निंदा करूं लागले; ह्मणून त्याचे ते दुर्गुण सुटावे असें मनांत आणून 'वार्विकानें त्यास लग्न करायाची मसलत सांगीतली; मग त्या अर्लाची संमति घेऊन राजानें फ्रान्स देशांत जाऊन सेवाय शहरची बोनागणी होती तिशीं लग्न करायाचा विचार ठ-

विली. पुढें फ्रान्स आणि इंग्लंड यांत लव-
कर ऐक्य व्हायाविषयीं वार्विक फ्रान्स दे-
शांत जाऊन उद्योग करीत असतां, एड्वर्डानें
तें बिगडलें. तें असें. इलिझाबेथ् वूड्विल
ह्मणून एक बायको होती, तीवर राजाची इच्छा
गेली; परंतु ती नाना प्रकारच्या युक्तींनीही वश
होईना ह्मणून त्याणें तिशीं लग्न केलें. असा
वार्विकाचा वास्तवीक अपमान करून, पुढें
एड्वर्डानें त्यास मंत्र्याचा स्थानापासून दूर करू-
न चिढिवला. ज्याचें चातुर्य आणि शौर्य हीं दो-
नही समान, असा वार्विक त्याणें राजाच्या ना-
श कराया विषयीं तीं दोनही खर्चून, असें सं-
धान केलें कीं, त्या एड्वर्डास राज्यांतून पळून
बाहेर जावें लागलें.

या रीतीनें पुनः एकवेळ त्या भयंकर
सिंहासनावर बसाया करितां बिचाऱ्या कष्टी
हेन्‍रीची बंदींतून मुक्तता झाली. तेव्हां पा-
र्लमेंटाची सभा झाली; तींतील सभासदांनीं
संतोषानें

संतोषानें ठरविलें कीं, हेनरी राजास राजा करावा; आणि वार्विकास राजकारक असें पद दिलें.

त्या वेळेस जरी एड्वर्डाचा पक्ष क्षीण झाला होता, तरी केवळ मोडला नव्हता. तो एड्वर्ड हालंड देशांत परागंदा असतांही बहुत लोकांस त्याचा अभिमान होता; ह्मणून त्यास देश सोडून नऊ महिने झाल्यावर, थोडीशी फौज बर्गंडीचे ड्युकानें दिली, तिचा आश्रयानें तो यार्कशांतांतले रेवन्स्पर गावांत येऊन उतरला. तो आला, त्याचा प्रथम इंग्लिशानीं विशेष उत्साह दाखविला नाहीं; परंतु उत्तरोत्तर त्याची फौज वाढत चालिली; आणि तो स्वस्थचित्तता आणि भलेपणा दर्शवी; या कारणामुळें बहुतांस त्याचा अभिमान पडला. तो यायास लागला तेव्हां लंडन शहरचे दरवाजे उघडले, असा तो राज्य पावल्यावर हतभाग्य हेनरी

राजा

राजा पुनः सिंहासनापासून भ्रष्ट होऊन पूर्वील रहायाचे स्थलीं आता झाला.

मग वार्विकाच्या कांहीं उपाय चालेना असा झाला; परंतु इतकें मात्र राहिलें कीं, एक शेवटची लढाई करून मनाची खुरखुर काढून टाकावी. त्या प्रसंगीं पुढें एडुर्डेच विजय पावला. त्या दोघांची लढाई सेंटआल्बानूस् शहराजवळ झाली, तेथें लांकास्त्रियन लोकांचा पराभव झाला, त्या काळीं वार्विक आपले फौजेची एक निवडक टोळी घेऊन जेथें दाट लढाई होत होती जेथें जात असतां, बहुतवार लागून शत्रूमध्यें पडून मृत्यु पावला.

तो शूर वार्विक मेला, आणि आपला पक्ष केवळ मोडला, असें पाहून राणी मार्गारेट फार कष्टी झाली; आणि तिचा नेत्रांतून अश्रुपात येऊं लागले; अशी ती इतके दिवसांत कधीं रडली नव्हती. मग

ती

ती सर्व अभिमान सोडून हांप प्रांतांत बो-लियु गांवचे धर्मशाळेंत जाऊन राहिली. तेथेंही तिला मदत करणारे कितिएक मिळाले; पेंब्रोकाचा अर्ल ट्युडर, डेवन प्रांताचा अर्ल कोर्तुनी; लार्डवेंन्लाक, सेंटजान, आणि दुसरे कितिएक मोटमोटे लोकांनीं तिला पुनः एक वेळ उत्तेजित केली; आणि ते मान्य झाले कीं, शेवट पर्यंत आह्मी तुला मदत करायास अंतर करणार नाहीं. तिणें इंग्लंडाचे बहुत करून सर्व परगण्यांत लढाया केल्या; परंतु ट्यूक्सबेरी पाकींचे तेथें जी झाली, तिणें तिचा उद्योगाची समाप्ति केली. तिचा संकट समयीं ही उपयोगी पडलेला, आणि तिचा पक्षाविषयीं मोठा आग्रही, असा सामर्सेटाचा ड्युक होता, त्याणें तिचा सैन्याचा सरदारपणा स्वीकारिला. तो गृहस्थ शूर, उदार, आणि सभ्य असा होता, परंतु साहसी आणि दांडगा. त्याणें ते-

थें तळ दिला होता तेथें प्रथम एड्वर्डानें येऊन हल्ला केला; त्यास त्याणें मोठा पराक्रम करून मागें फिरविला; तेव्हां शत्रूंचें सर्व सैन्य घाबरून मागें गेलें. ते पळाले, असें समजून ड्युक त्यांचे पाठीस लागला; आणि लार्ड वेन्लकास सांगीतलें कीं, तूं माझी पाठ राख. त्या लार्डानें त्याची आज्ञा मानिली नाहीं; ह्मणून सामर्सेटाचे फौजेवर बहुत लोक येऊन पडल्यामुळें ती व्याकुळ झाली त्या भयंकर विपत्तिकाळांत आतां सर्व उपाय हरले असें समजून सामर्सेटास क्रोध आवरेनासा झाला; मग जा ठिकाणाहून तो निघाला तेथेंच वेनलाक निरुद्योगी बसून राहिला पाहून, रागानें आपलें मोटें लढाईंतलें हत्यार हातांत घेऊन त्या भ्याडाचे आंगावर धांवला, आणि एका फटकाऱ्यानें त्यास ठार मारिता झाला.

ती लढाई झाल्यानंतर राणी आणि राजपुत्र यांस धरून राजा एड्वर्डाचे सभेस नेलीं

नेलीं. तो राजपुत्र, एड्वर्डीचे समोर मोठे धीटपणानें आऊन उभा राहिला. त्यास लागावें ह्मणून असें पुसलें कीं, अरे तुला आज्ञेवांचून इंग्लंडावर येऊन हल्ला करायास कसा धीर झाला? त्या वेळेस आपले विपत्तीकडे लक्ष न देऊन, तो उत्तम कुळाच्या अभिमानानें बोलिला. "माझे बापानें जें दुःख भोगिलें त्याच्या सूड उगवाया करितां, आणि आपल्यास संकटांतून मुक्त कराया करितां, मी आपले बापाचे राज्यांत आलों." असा त्या मुलाचा धीर पाहून तो निर्दय एड्वर्ड राजा फार कोपला; आणि त्याणें आपले हातांत लोखंडाचें कवच होतें तें त्याचे तोंडावर मारिलें; तें पुढें लोकांस अधिक दुष्टपणा करायास उदाहरण झालें. तें असें. ग्लोसेस्तर आणि क्लारेन्स् एथील डयुक आणि दुसरे कितिएक गृहस्थ तें पाहून पशूं सारिखे त्यावर धांवून गेले, आणि आपले तरवारींनीं त्यास मा-

र मारिते झाले. तरी तो रौद्र रस पूर्ण झाला नव्हता; तो पुढें झाला. हेनरी राजा बहुत दिवस पर्यंत स्वस्थ मनें करून हें सर्व भयंकर वर्तमान पहात होता; त्या बिचाऱ्यासही माराया‌च्या हुकुम झाला. मग ग्लोसेस्तराचा ड्युक, ज्याचें नाव पुढें तृतीय रिचर्ड पडलें, तो त्याचे खोलींत शिरून त्यास स्वस्थपणें मारिता झाला. जितके लोक धरिले होते त्यांतून एक मार्गारेटेस मात्र वांचविली. फ्रान्साच्या राजा पैका देऊन तिला सोडवील असें त्यांस वाटलें म्हणून, त्याणीं कदाचित् असें केलें असेल; आणि त्यांस वाटलें तें खरेंच, कारण कीं, पुढें त्याणें इंग्लंडाचे राजास पन्नास हजार क्रौन देऊन तिला सोडविली. ती असाधारण बायको, जीणें नवऱ्याचे पक्षास अनुसरून बारा लढाया केल्या; आणि संपत्ति, मुलें, स्नेही, हें सर्व गेल्याचे पाठीमागें वांचली;

ती पुढें कांहीं वर्षांनीं फ्रानूस देशीं मोठ्या दुःखांत मृत्यु पावली. तिचा शूरपणा आणि विपत्ति यांवर लक्ष्य देऊन मात्र काय तें तिचे विषयीं मनांत दुःख होतें.

---

## प्रकरण १९

### चतुर्थ एड्वर्ड राजाची कथा.

### सन १४६१ पासून १४८३ पर्यंत.



एड्वर्ड राजाचे मोठमोठे शत्रू लयास गेल्यावर त्याणें लहानाचें शासन करायाचा प्रारंभ केला. मग सुळावर शत्रूंचीं शरीरें लोंबूं लागलीं; आणि यांची संपत्ति स-

त होऊन राजाजवळ येऊं लागली. तो इकडे या रीतीनें लोकांस भयंकर होता; परंतु तसाच कुत्सित विषय सुखांतही रमत असे. दरबारी लोकांचे मनांत त्याचा वाईट खोडी वाढाव्या असें होतें; कारण त्यांसही तशांत भोगावयास सांपडे. तो जें जें पातक करी त्याचें लहानसें प्रायश्चित्त करून धर्माध्यक्ष त्यास शुद्ध करीत. त्या राजाचे वेळेस मोठमोठीं पातकें अभ्यासांत पडून गेलीं होतीं, त्यांत व्यभिचार हें कांहींच नव्हे असें वाटे. शोर ह्मणून एक शहरांतला व्यापारी होता, त्याची बायको अतिशय सुंदर आणि पतिव्रता होती; परंतु सुंदर पुरुष आणि तशांत राजा आपली इछा करितो हें पाहून, तिचें पातिव्रत्य गेलें, आणि ती त्या राजास वश झाली.

त्याणें अनेक दुष्ट कर्मे आचरलीं, त्यांत त्याचा भाऊ क्लारेन्साचा ड्यूक त्यास

जे त्याणें निरर्थक दुःख दिलें ती गोष्ट चमत्का-
रिक आहे, म्हणून एथें सांगतो. या ड्युका-
चा एक, टामस् बर्डेट म्हणोन स्नेही होता,
त्याचे बागांत एके दिवशीं पारधी करीत अ-
सतां राजानें बर्डेटाचें आवडतें असें एक बद-
क मारिलें. तें पाहून बर्डेटास राग आला;
आणि तो बोलिला कीं, राजास ज्याणें अशी दु-
र्बुद्धि सांगीतली असेल त्याचे पोटांत हरणा-
चीं शिंगें पडोत. अशे लहान गोष्टीसाठीं ब-
र्डेटास अन्यायी ठरवून टैबर्न शहरांत त्या-
चा शिरछेद केला. अशी आपले परम मि-
त्राची दशा झाली पाहून क्लारेन्साचे ड्यु-
कास फार दुःख झालें, आणि तो आपले
भावाची बहुत निंदा करूं लागला; कीं, बर्डे-
टास जें शासन केलें तें अयोग्य. त्याचा उ-
द्धतपणा पाहून राजास कोप आला. मग
त्याणें तें निमित्त करून त्यास चौकशी क-
राया करीतां लार्डाचे सभेस नेलें; आणि

त्याने

त्याचे अन्यायाच्या पुरावा करायास आपण स्वतः गेला. त्या काळीं बळकट जो असेल त्याचा पक्षाच्या न्याय होत असे; ह्मणून ड्युकावर अन्याय लागूनझाला. तेव्हां त्यास विचारिलें कीं, तूं कोणत्या रीतीनें मरणार? त्याची गोड दारूवर फार प्रीति असे, ह्मणोन त्याणें सांगीतलें कीं तींत बुडून मी मरणार. मग त्यास किल्यांत त्या दारूच्या मोट्या पिपांत बुडवून मारिलें. या राजाचें राज्य वाईट खरें, परंतु त्यांत इतकें चांगलें मानायाचें कीं तें थोडक्यांत आटपलें. तें असें. तो फ्रान्स देशांत युद्धास जायाची तयारी करीत असतां, त्यास एक रोग झाला; तेणेंकरून तो बेचाळीसावें वर्षी मेला. हेनरी राजा मेला तेव्हां पासून मोजलें तर त्याणें तेवीस वर्षें राज्य केलें.

---

# प्रकरण २०

## पंचम एड्वर्ड राजाची कथा

### सन १४८३



चतुर्थ एड्वर्ड राजाचे मुलांचे भयापासून रक्षण व्हावें, असें निमित्त करून राज्याचा संरक्षक ग्लोसेस्तराचा ड्युकास केला होता. त्या ड्युकानें प्रथमच त्या दोनही मुलांस नेऊन किल्यावर टाकिलीं. अशीं स्वाधीन झाल्यावर, त्याणें बातमी उठविली कीं, तीं राजाचे धर्मस्त्री पासून उत्पन्न झालेलीं नव्हत; आणि या रीतीचीं अनेक विघ्नें करून त्यांस राज्याभिषेक व्हायाचा जो दिवस नेमिला होता तो टाळिला. पुढें त्याणें बेत केला कीं, राजपुत्राचे पक्षाचा लार्ड

हेस्तिंगूझ्म ह्मणून दरबारांत गृहस्थ होता त्या-स नाहींसा करावा.

मग त्याणें किल्यांत हेस्तिंगूझाला एके सभेस बोलावून नेलें, आणि आपण भिंवया मोडीत, ओंठ चावीत, आणि कांहीं तरी मनांत त्रास उत्पन्न झाला आहे असें दाखवीत तेथें गेला. तें पाहून कांहीं वेळपर्यंत कोणी कांहींच बोलेनात. त्या सभेंतील लार्ड एकमेकाकडे पाहूं लागले; आणि मनांत समजले कीं, आज कांहीं तरी एथें घोर कर्म होतें खरें. मग त्या डयुकानें आपले हातावरचें वस्त्र काढून दाखविलें तों सर्व हात झडून जाऊन कुरूप झालेला असा दिसला; तो दाखवून असें बोलिला कीं, जेनशोर आणि तिचे स्नेही याणीं कांहीं गोडबंगाल करून असा माझा हात विरूप केला. त्यावर हेस्तिंगूझ्म बोलिला, "जर त्यांचे हातोन असा अपराध घडला असला, तर त्यांस शासन करावें हें

योग्य

योग्य." राज्य संरक्षक हें ऐकून उच्च स्वरानें ह्मणाला "तूं मला, जर घडला, असें उत्तर देतोस काय ? मी तुला सांगतों कीं त्याणीं मी मरावें अशी युक्ति केली आहे ; आणि अरे लुच्चा ! त्या अपराधांत तुझें ही अंग आहे." मग त्याणें दोन वेळ मेजावर हात आपटिले; इतक्यांत त्या खोलींत हत्यार बंद लोक येऊन भरले. तेव्हां तो राज्य संरक्षक हेस्तिंग्झाला ह्मणाला; "तूं सरकारच्या गुन्हेगार ह्मणून तुला धरितों." असें बोलोन त्याणें त्यास शिपायांचे हातीं दिलें. दैव वशात् जवळ एक धर्माध्यक्ष होता त्या जवळ हेस्तिंग्झानें आपले पातकांच्या उच्चार केला; कारण संरक्षकानें शपथ घेतली कीं याचें डोकें तुटलेलें पाहिल्यापूर्वी मी अन्न घेणार नाहीं. मग त्यास किल्ल्याचे देवळा पुढचे धाकटे शेतांत जलदीनें नेलें, आणि तेथें एक वाटेवर लांकूड पडलें होतें त्यावर त्या-

च्या शिरच्छेद केला.

त्या नंतर चतुर्थ एड्वर्ड राजाची स्त्री जेनशोर होती ह्मणून पूर्वी सांगीतलें, तीवर त्याणें वक्र दृष्टी केली. त्या बिचारे बायकोशीं त्याणें द्वेष करावा इतकी तिचेमध्यें कांहींच योग्यता नव्हती खरी, परंतु दुष्टास नाश करायास निमित्त लागत नाहीं. त्याणें तिचेवर गोडबंगालाचा आरोप ठेविला, तो केवळ खोटा अशी सर्व लोकांची खातरी होती; ह्मणून त्याचें कांहीं चालेना; पुढें वास्तवीक जें तिचे हातून पातक घडलें होतें तें बाहेर काढून त्याणें घात केला. तें वर्तमान असें. जेनशोर ही लांबर्ड गल्लींत राहाणारे एके सोनाराची बायको. ती त्याला सोडून एड्वर्डाशीं संयुक्त झाली आणि त्याचे कुत्सित दरबारांत पतिव्रता स्त्रीची योग्यता पावली. जी मुळची हलकी असून, कांहीं दिवस पर्यंत च्हूंन दरबारांतली संपत्ति भोगीत होती, ती पुनः

पूर्वीची

पूर्वींची नीच पदवी पावली ही गोष्ट पाहून लोकांस फार वाईट वाटलें नसेल, असा तर्क दिसतो. असा तिजवर जन प्रसिद्ध आरोप ठेविला, तो तिचानें खोटा ह्मणवेना; मग तिणें आपले पातकांचा उच्चार केला; तेव्हां तिला अशी आज्ञा केली कीं, उघड्या पायीं शहर भर फिरावें; आणि सेंटपालाचे देउळांत जाऊन प्रायश्चित्त करावें; तसें तिणें हजारों लोक पहात असतां पांढरें कापड नेसून हातांत मेणवात घेऊन केलें. हें वर्तमान घडल्यावर ती सुमारें चाळीस वर्षे होती; आणि शेवटीं फार दारिद्र्य दुःख अनुभवून मेली.

मग राज्य मिळण्याविषयीं उघड उद्योग केला असतां साधेल असें समजून राज्य संरक्षकानें चोरून होतें तें सोडिलें; आणि त्या पूर्वी राजपुत्रांवर जी बाहेरून तरीं ममता करीत होता तीही करीनासा झाला.

ला. गुणवंत आणि मतापी असा बकिं-
गमाचा ड्युक त्या मुलांचे पक्षाचा होता,
त्यास त्याणें लांच आणि वचनें देऊन पूर्वी-
च आपले स्वाधीन करून ठेविला होता.
मग त्या संरक्षकानें सेंटपालाचे देवळा-
जवळ गांवचे लोकांची आपली सर्व बुद्धी
खर्चून खुशामत केली; तेव्हां लोक कांहीं
बोलेनात. तें संमतीचें लक्षण असें करू-
न, त्याचे सेवक बोलिले;" राजा रिचर्ड श-
तायुषी होऊ." मग लागलाच आल्डर्मा-
न आणि मेयर याणीं त्यास मुकुट आ-
णून दिला; तो त्याणें कांहींसा अनमान क-
रून धारण केला.

---

# प्रकरण २१

## तृतीय रिचर्ड राजाची कथा

## सन १४८३ पासून १४८५ पर्यंत

प्रथम एक दुष्कर्म घडलें, ह्मणजे पुढें दुसरींही होत जातात. या कारणामुळें राजा रिचर्डानें सिंहासनारूढ होतांच, किल्ल्यावरचे अमलदारास हुकूम केला कीं, पूर्वील राजाचे दोन पोरांस ठार मारून टाक; परंतु धीट गृहस्थ, (ज्याचें नाव ब्राकेन्बरी) तो दुष्ट राजाची मर्जी सिद्धीस नेण्यास आपण हेतु झाला नाहीं. त्याणें नम्रतेनें उत्तर पाठविलें कीं, अज्ञान मुलांचे रक्तांत आपले हात कसे भिजवावे, हें मला कळत नाहीं. त्याणें जरी नाहीं ह्मटलें, तरी राजास

स तें काम कराया जोगा दुसरा पुरुष मिळायास बहुत दिवस लागले नाहीं. सरजेम्स टिरल ह्मणून होता, त्याणें तें काम स्वीकारिलें; तेव्हां ब्राकेन्बरीस एक रात्र पर्यंत किल्ल्याच्या चाव्या त्या जवळ द्याव्या असा राजानें हुकुम केला. टिरेलानें आपले बरोबर तीन पुरुष घेतले; त्यांचीं नावें, स्लेटर, डैटन, आणि फारेष्ट. त्यांस बरोबर घेऊन तीं मुलें जेथें होतीं त्या खोली जवळ तो गेला; आणि आपण बाहेर राहून त्याणें बरोबरच्यांस सांगीतलें कीं, आंत आऊन तुह्मी आपलें काम बजावा. ते आंत गेले तेव्हां त्याणीं त्या मुलांस गाढ झोंप लागली आहे असें पाहिलें. मग उंशा होत्या त्याहीं करून प्राण कोंडून त्यांस मारिलें; आणि त्यांचीं उघडीं शरीरें टिरला जवळ नेलीं. त्याणें तीं जिन्याचे खालचे आंगास वर दगड घाडून पुरलीं.

या रीतीनें आपली सत्ता दृढ करायाकरितां रिचर्ड राजाचे प्रयत्न चालिले असतां, ज्याणें त्यास राज्य प्राप्त व्हायास साहित्य केलें होतें, असा जो बकिंगमाचा ड्युक, त्याणें, जप्त झालेली कांहीं जमीन आपल्या करितां मागीतली; ती राजानें दिली नाहीं ह्मणून, तो राजाशीं बिघडला. मग तो वेल्स् प्रांतांत पुष्कळ फौज जमवून त्वरेनें ग्लोसेस्तराजवळ आला; तेथून सेवर्न नदी उतरून आवें असा त्याचा बेत होता. त्या वेळेस नदीस असा पूर आला होता कीं, दोनही बाजूंची जमीन बुडून जाऊन कांहीं डोंगराचे शिखरास पाणी लागलें होतें; ह्मणून बकिंगमाचे लोकांस पलीकडे जातां येईना, आणि होते तेथें सामान मिळेना; अशी दुर्दशा झाली. त्याणीं तें सर्व सोसून तेथेंच राहावें ह्मणून ड्युकानें यत्न केला; परंतु ते राहीनात; आणि चहुंकडे



पसरून

पसरून मागें गेले. तसे संकटांत, ड्युक कांहींसा विचार करून एक बानिस्तर नामें पुरुष होता त्याचे घरीं जाऊन राहिला. तो पूर्वीं त्याचे चाकरीस होता, आणि त्याचे कुटुंबाचे त्यावर बहुत उपकार झाले होते परंतु त्याचे ड्युकाच्चें डोकें आणावें ह्मणजे मोठें इनाम मिळेल, असा हा लोभ त्याचानें जिंकवेना; तेव्हां त्याणें श्राप प्रांताचे शेरीफास जाऊन तें वर्तमान सांगीतलें, त्याणें त्या भिकाऱ्याच्चें सोंग घेतलेल्या ड्युकास धरून साल्सबेरीस नेलें; तेथें त्याची चौकशी होऊन शासन ठरून त्याचा शिरछेद केला. पुढें अशी बातमी आली कीं, रिच्मंडाचा अर्ल इंग्लंडांत येऊन राज्य आपण घ्यावया करितां तयारी करितो आहे. तो कोठून येऊन हल्ला करील हें रिचर्ड राजास कळेना; ह्मणून तो राज्याचे मध्यभागीं नाटिंगमांत जाऊन राहिला; मनांत कीं शत्रू

कोठून आला तरी त्याचें निवारण करितां यावें.

कांहीं दिवसांनंतर जान आफगांट याचे कन्ये कडील वंशाचा रिच्मंडाचा अर्ल होता, तो राज्या करितां बखेडा करूं लागला. त्याशीं आणि यार्कीचे संस्थानाशीं वांकडें होतें, ह्मणून तो राज्यांतून बाहेर गेला होता; परंतु राजाचा लोक फार कंटाळा करितात; हें पाहून तो बरोबर सुमारें दोन हजार लोक घेऊन नार्मंडी प्रांतांतले डार्फुअर गांवांतून निघाला; आणि सहा दिवसांनीं वेल्स प्रांतांतले मिल्फोर्ड गावांस येऊन पोंचला; तोंपर्यंत कांहीं प्रतिबंध झाला नाहीं. तो आला ही गोष्ट कळतांच रिचर्ड, जामध्यें शौर्य आणि धीटपणा हे मात्र गुण होते, त्याणें असा निश्चय केला कीं, शत्रूंशीं जाऊन एकाएकीं लढाई करावी. इकडे रिच्मंडास

डास, सरटामस बौचियर, सरवा-
ल्टर हंगर्फोर्ड आणि दुसरे कितिएक
येऊन मिळाले; मग तो सुमारें सहा हजार
फौज घेऊन पुढें झाला. थोडेच दिवशीं दो-
नही सैन्यें येऊन बासूवर्थ फील्डाज-
वळ पोंचलीं. त्या दोघांची लढाई झाली;
तींत रिचर्ड मेला. आणि रिच्मंडास
सप्तम हेनरी असें नाव ठेवून राजा केला. रा-
ज्यांत सुमारें चाळीस वर्षें पर्यंत आंतून ब-
रकशा लागोन जीं मैदानें रक्तानें भरत अ-
सत, त्याची अशी समाप्ति झाली.

---

# प्रकरण २२

## सप्तम हेनरी राजाची कथा.

### सन १४८५ पासून १५०९पर्यंत.



हेनरी राजा सिंहासनावर बसतांच प्रथम त्याणें इलिझाबेथ राणीशीं लग्न केलें. ही इलिझाबेथ चतुर्थ एडवर्ड राजाची कन्या; म्हणून त्याणें तिशीं लग्न करून यार्क आणि लांकास्तर या दोन संस्थानां मधील वैर मिटवून ऐक्य केलें. पुढें कधीं त्या दोन संस्थानांत वैमनस्य पडलें नाहीं.

पूर्वजांचे ख्याली खुशाली करितां पैसा खर्च होऊन दारिद्य प्राप्त झाल्यामुळें त्यांस इतकीं संकटें प्राप्त झालीं, ही गोष्ट

हेनरी राजाचे मनांत येऊन त्याची खातरी झाली कीं, पुष्कळ द्रव्य संपादन केलें, तरच आपलें दैव आपणास अनुकूळ होईल. ह्मणून शत्रूंची जी संपत्ति जप्त होऊन त्यास मिळे, ती तो मोठ्या विचारानें खर्च करी.

इलिझाबेथ आणि तो या दोघांचें लग्न झाल्यानंतर, लागलीच त्याणें जाहीर खबर लाविली कीं, ज्यांची इछा असेल त्यांस मी क्षमा करितों; परंतु त्या वेळेस आंतलेआंत खुरस लागल्यामुळें लोक असे बेपर्वा झाले होते कीं, कोंणत्या अमलदाराचे हातून त्यांचा बंदोबस्त होत नसे, किंवा कोणत्या राजाचानें मनोरंजन होत नसे. ह्मणून पुढें असें झालें कीं, एक बंड मोडलें ह्मणजे लागलेंच दुसरें व्हावें.

आक्सफर्ड शहरांत रिचर्ड सैमन ह्मणून एक धर्मपक्षी रहात होता; तो किंचित् धूर्त होता, परंतु त्याचामधें दांडगेपणा

फार असे. त्याणें लांबर्ट सिम्नेल ह्मणून एके रोटीघाल्याचा मुलगा होता; त्यास क्लारेन्साचे ड्युकाचा मुलगा जो वार्विकाचा अर्ल त्याचें सोंग घ्यायाची युक्ति शिकवून तयार केलें; जा क्लारेन्सास दारूचे पिंपांत बुडवून मारिला अशी मागें गोष्ट सांगीतली. परंतु तो तोतया सर्व लोकांचे लागलाच दृष्टीस पडला असतां कठीण, ह्मणून प्रथम अयर्लंडांत त्याणें तें सोंग घ्यावें असा विचार केला.

मग त्या सिम्नेलास लार्डलोवेल, आणि विरुद्ध पक्षाचे दुसरे कितिएक लार्ड येऊन मिळाले; आणि या रूपानें त्याणें इंग्लंडास आयाचें योजिलें. मग तो प्रथम लांकाशायर प्रांतास गेला; आणि तेथून पुढें यार्क प्रांतास चालिला. त्याचा मनांत असें होतें कीं, वाटेनें गांवोगांवचे लोक येऊन आपल्यास सहाय होतील; परंतु अशी

आज्ञा करून तो फसला गेला. तो असा कीं, त्या जवळ जर्मन आणि ऐरिश फौज होती तिशीं जाऊन आपण मिळावें हें लोकांस ठीक वाटेना; आणि राजाचे सुनीतीच्या त्यांस धाक होता; या दोन कारणामुळें ते स्वस्थ राहिले; आणि जितकें त्यांचे हातोन झालें, तितकें त्याणीं राजाचे पक्षास साहित्य केलें. म्हणून त्या तोतयाचे सैन्याचा सरदारपणा ज्याचे जवळ होता, असा जो राजाशीं विरुद्ध लिंकनाच्या अर्ल, त्याणें तत्क्षणींच युद्ध केल्या वांचून उपाय नाहीं, असें पाहून तें करायाचा निश्चय केला. मग उभयपक्षींचीं सैन्यें नातिंगमप्रांतांत स्तोक शहरांत भिडलीं; आणि लढाई सुरू झाली. तीं दोन सैन्यें समान नसतां त्यामध्यें लढाई मोठी निकराची झाली, आणि लोक फार पडले. परंतु शेवटीं राजाचा विजय झाला. लार्ड लिंकन त्या लढाईंत प

डला; आणि लार्ड लोबेलाची दशा काय झाली तें कांहीं समजलें नाहीं; त्यावरून असा तर्क करितात, कीं त्याचीही गति तीच झाली असेल. सिम्नेल आणि त्याचा गुरु सेमन यांस धरून बंदीस घातलें. त्या लढाईंत चार हजार लोक पडले. सेमन धर्मपक्षी होता ह्मणून त्याची चौकशी न्यायागारांत होईना. त्यास नुसतें कैदेंत मात्र ठेविलें सिम्नेलापासून राजास कांहीं भय किंवा शंका व्हायाचें कारणच नव्हतें; ह्मणून त्यास राजानें क्षमा केली; आणि आपले स्वयंपाकखान्यांत हलकें काम सांगीतलें. पुढें त्याजवळ ससाणें बाळगायाचें काम झालें. अशे हलके स्थितींत तो मृत्युं पावला.

मग यार्क प्रांतांत नवें एक बंड उत्पन्न झालें. तें असें प्रजांवर कर बसवायाविषयीं कितिएक लोकांस मुखत्यार

करूनें

करून नेमिले होते; त्यांचें लोक ऐकेनात; ह्मणून नर्थंबर्लंडाचा अर्ल राजाची आज्ञा सिद्धीस न्यायाविषयीं प्रयत्न करूं लागला. परंतु तो मसलत सांगून आपणास दुःखें देववितो असें समजून, लोकांनीं धट्टाईस येऊन त्याचे घरावर हल्ला केला; आणि त्याचा प्राण घेतला. इतकें करूनही ते उगे राहिले नाहींत; पुढें त्याणें एक नीच कुळांतला जान आर्चेंबर ह्मणून लबाड पुरुष होता, त्याचे बुद्धीस लागून सरजान एग्रिमंट ह्मणून एक होता, त्यास आपला सरदार केला; आणि राजाशीं उघड वैर करायाकरितां सिद्ध झाले. राजानेंही अविचारी मसलत समजतांच पुष्कळ फौज जमवून ती सरेच्या अर्लाचे स्वाधीन केली; त्या गृहस्थानें त्या बंडवाल्यांचा पराजय करून दंगा मोडून त्यांचा मुख्य आर्चेंबर होता, त्यास धरून केदें-

त ठेविलें. थोडे दिवसानीं त्याचा शिरछेद केला; परंतु सरजान आर्चिमांट, बर्गंडीचे ईंचेसेचे* दरबारांत शरण जाऊन राहिला. असेंच त्यावेळस जे इंग्लंडाचे राजाशीं वांकडे असत, ते तेथें जाऊन रहात.

ही कथा वाचणाराचे मनांत गोष्ट अशी येत्ये कीं, सिम्नेलाचें बंड सिद्धीस गेलें नाहीं, तें पाहून तसा तोतयाचा उद्योग करावा असें कोणाचे मनांत आलें नसेल; परंतु ती बर्गंडीची डचेस आपले पूर्वींचे उद्योग सिद्धीस गेले नाहींत ह्मणून संतापोन जा इंग्लंडाचे राज्याचा तिचानें नाश करवेना, त्यांत गडबड तरी करावी असा बेत करिती झाली. प्रथम तिणें जिकडे तिकडे बातमी पसरिली कीं,

* डचेस हें डयुक शब्दाचें स्त्रीलिंगी रूप. बर्गंडी प्रांत फ्रान्स देशाचे दक्षिणभागीं आहे.

याकीचा धाकटा ड्युक, जास किल्ल्यांत मारिलें असें ह्मणतात, तो वाचून जीवंत आहे. ती बातमी मोठ्या आशेनें लोक खरी मानितात असें पाहून, तिणें एक मुलगा मिळविला. त्यास त्या ड्युकाचें नाव ठेविलें, आणि त्याचें रूप दिलें. ड्युकाचें नाव आस्बेक किंवा वार्बेक होतें. मुलगा मेळविला होता तो चतुर्थ एड्वर्ड राजाचे वेळेस एक क्रिस्तियन इस्राइल झालेला इंग्लंडांत येऊन राहिला होता त्याचा मुलगा. त्याचें नाव पीटर, परंतु त्या नावाचा अपभ्रंश होऊन त्यास पिटर्किन किंवा पर्किन असें ह्मणत असत. तें पोर आपले कामाचे अतिशय उपयोगी पडेल असें त्या डचेसेला वाटलें; आणि तो मुलगा चपळ होता ह्मणून तिणें याकीचे ड्युकाचें सोंग घ्यावयाविषयीं जो उपदेश केला तो.

सर्व

सर्व त्याणें लागलाच शिकून मनांत दृढ धरून ठेविला. सारांश, त्याचें सुंदर शरीर, दरबारी वेष, प्रौढ व्यवहार, आणि मनोरंजक भाषण, हें पाहून सर्व लोक मोहित झाले. जांस ती खचित लबाडी असें समजलें होतें ते मात्र नाहीं.

इंग्लिशांस बंड करायाची मोठी हौस, ह्मणून त्याणीं त्या बडबडीवर विश्वास ठेविला; आणि दुसरें असें झालें कीं, त्यांच्या असंतोष आणि भोळेपणा यांहीं करून जा गोष्टीचा प्रारंभ झाला होता, ती त्या मुलाचें चातुर्य, भाषण, आणि सौंदर्य, यांहीं सिद्धीस नेली.

पर्किनाचे पक्षाचा अभिमान इंग्लंडांतही कितिएक गृहस्थांस पडला, त्यांत लार्ड फिझ्वाल्टर, सर सेमन मांत्फोर्द, सर टामस् थ्वेट्स्, आणी सर राबर्ट क्लिफोर्ड हे होते. परं-

तु

तु या सर्वांत मोठा वजनदार आणि निवारण क्याच्या कठीण, असा सर विलियम स्तान्ली, लॉर्ड चेंबर्लिन हा होता. हा गृहस्थ, जाणें राजा हेनरीस राज्यभिक्षा विषयीं साहित्य केलें असा जो प्रसिद्ध लार्ड स्तान्ली, त्याचा भाऊ. त्याचा त्या गोष्टीवर विश्वास बसला असो, किंवा त्याचे मनांत लोभाची कल्पना असो; या दोहोंतून एक लक्ष्यानें त्याणें राजाशीं उघड द्वेष आरंभिला. मग इंग्लंडांतले आणि फ्लांडर्स देशाचे बंडवाले यामध्यें कागदपत्र होऊन ठराव होऊं लागले.

असे चहूंकडे राजाचे नाशा विषयीं बेत चालिले असतां, राजा हेनरीनें शत्रूंचे मसलतीची चौकशी राखिली होती. राज्याविषयीं स्पर्धा करणारे त्यामु

---

* राजाची घरगुती वहिवाट पहाणारे अमात्यांतलें हें एक पद आहे.